**अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठी घरकुल योजनेची अंमलबजावणी करणेबाबत............**

**महाराष्ट्र शासन**
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
पुरकपत्र क्र.बीसीएच -२००९/प्र.क्र.१५९/मावक-२
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ६ ऑगस्ट, २०१०

**वाचा:-** १) शासन निर्णय क्र.बीसीएच-२००८/प्र.क.३६/मावक-२, दि.१५.११.२००८
२) शासन निर्णय गृहनिर्माण विभाग क्र.रागांयो-९९/प्र.क्र.१८०/गृनियो-१,दि.२१.८.२००९
३) शासन निर्णय ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र.इंआयो-२००९/प्र.क्र.१५३/योजना-१०, दि.३१.८.२००९
४) शासन निर्णय क्र.बीसीएच-२००९/प्र.क्र.१५९/मावक-२, दि.९.३.२०१०
५) शासन निर्णय ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र.इंआयो-२०१०/प्र.क्र.३४/योजना-१०, दि.९.४.२०१०

**प्रस्तावना :-**

ग्रामविकास विभागामार्फत डीआरडीएच्या माध्यमातूल इंदिरा आवास योजना दारिद्रय रेषे खालील बेघर लोकांसाठी ग्रामीण भागात राबविण्यांत येत आहे. त्याच धर्तीवर अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठी ग्रामीण भागातील घरकूल योजना डीआरडीएच्या माध्यमातून राबविण्या संदर्भातील आदेश दि. ९.३.२०१० रोजी पारित करण्यात आले आहेत. तथापि, ग्रामविकास विभागा कडून दारिद्रय रेषेखालील बेघर लोकांसाठी राबविण्यात येत असलेल्या इंदिरा आवास योजना व अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठी अंमजबजावणी करण्यात येत असलेल्या योजना यामध्ये तफावत आहे. सदर तफावत राहू नये म्हणून अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठी ग्रामीण भागात राबविण्यात येत असलेल्या योजनांच्या अनुषंगाने दि. ९.३.२०१० रोजीच्या शासन निर्णयात काही बदल करुन पुरकपत्र काढण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**पुरकपत्र :-**

१) संदर्भाधीन शासन निर्णय दि.९.३.२०१० मधील परिच्छेद ३ मधील लाभार्थ्यास शासनाच्या एकाच योजनेचा लाभ मिळणे नंतर " कोणत्याही परिस्थितीत घरकुल योजनेअंतर्गत लाभार्थ्यास एकाच योजनेचा लाभ देण्यात यावा " यापुढे पुढील स्पष्टीकरण समाविष्ट करण्यात यावे.

**स्पष्टीकरण:-** या विभागाने मागासवर्गीय गृहनिर्माण संस्थांना जमीन खरेदी अनुदान आणि बांधकाम अनुदान किंवा यापैकी एक अदा केलेले असल्यास त्या मागासवर्गीय गृहनिर्माण संस्थांमधील सभासदांपैकी ज्या सभासदाने या घरकुल योजनेसाठी अर्ज सादर केले असतील तर ते अर्ज अपात्र या संवर्गात जमा करण्यात यावे. तसेच मागासवर्गीय गृहनिर्माण संस्थांमधील लाभ घेतलेल्या अशा मागासवर्गीय सभासदांची यादी विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी / समाजकल्याण अधिकारी गट-अ, जिल्हा परिषद यांनी मुद्दा क्र.१४ मध्ये नमूद केलेल्या संबंधित घरकुल निर्माण समितीस उपलब्ध करुन द्यावी.

२) संदर्भाधीन शासन निर्णय दि.९.३.२०१० मधील परिच्छेद ४ अ), ३ मधील कुटुंबाची वार्षिक उत्पन्न मर्यादा मधील ड) नंतर पुढील टिप समाविष्ट करण्यात यावी.

**टिप:-** कुटुंबाची वार्षिक उत्पन्न मर्यादा वरीलप्रमाणे जरी असली तरी प्रस्तुत घरकुल योजनेस अनुसरुन शासनाकडे प्राप्त झालेल्या अर्जांमधील पात्र अर्जदारांपैकी ज्यांची नावे दारिद्रय रेषेखालील कुटुंबाच्या यादीमध्ये समाविष्ट आहेत त्या लाभार्थींना प्रथम टप्प्यात सर्वोच्च प्राधान्य देण्यात येईल व त्यानंतरच दारिद्रय रेषेवरील पात्र अर्जदारांना दुस-या टप्प्यात लाभ देण्यात येईल.

३) शासन निर्णय दि.९.३.२०१० मधील परिच्छेद ९ येथे प्राधान्य क्षेत्र या शिर्षातील 'ई' च्या खालील टिप समाविष्ट करण्यात यावी.

**टिप:-** प्रस्तुत घरकुल योजनेस अनुसरुन शासनाकडे प्राप्त झालेल्या अर्जांमधील पात्र अर्जदारांपैकी ज्यांची नावे दारिद्रय रेषेखालील कुटुंबाच्या यादीमध्ये समाविष्ट आहेत त्या लाभार्थींना प्रथम टप्प्यात सर्वोच्च प्राधान्य देण्यात येईल व त्यानंतरच दारिद्रय रेषेवरील पात्र अर्जदारांना दुस-या टप्प्यात लाभ देण्यात येईल.

४) शासन निर्णय दि.९.३.२०१० मधील परिच्छेद क्र.१८ मध्ये लॉटरी पध्दतीने, लाभार्थींची निवड करणे या ऐवजी पुढील परिच्छेद समाविष्ट करण्यात येत आहे.

**टिप:-** प्रस्तुत घरकुल योजनेस अनुसरुन शासनाकडे प्राप्त झालेल्या अर्जांमधील पात्र अर्जदारांपैकी ज्यांची नावे दारिद्रय रेषेखालील कुटुंबाच्या यादीमध्ये समाविष्ट आहेत त्या लाभार्थींना प्रथम टप्प्यात सर्वोच्च प्राधान्य देण्यात येईल व त्यानंतरच दारिद्रय रेषेवरील पात्र अर्जदारांना दुस-या टप्प्यात लाभ देण्यात येईल. ग्रामीण भागाकरीता गाव निहाय, नगरपालिका व महानगरपालिका क्षेत्राकरीता वार्डनिहाय दारिद्रय रेषेखालील कुटुंबाची यादी विचारात घेण्यात यावी व त्यामध्ये दारिद्र रेषेखालील कुटुंबांची संख्या चढत्या क्रमाने लावण्यात यावी. तदनंतर दारिद्रय रेषेखालील कुटुंबांची कमी संख्या असलेल्या गावे व वार्डामधील पात्र लाभार्थ्यांना या योजनेचा लाभ देण्यात यावा व त्यानंतर चढत्या क्रमाने आलेल्या गावे व वार्डामधील पात्र लाभार्थींना लाभ देण्यात यावा.

**२.** हे शासन पुरकपत्र ग्राम विकास व जलसंधारण विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत असून ते महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आले असून, त्याचा संगणक क्रमांक २०१००८०६१८०२४१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**सही/-**
**( सतीश म.गवई )**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,
मा.राज्यपाल यांचे कार्यालय
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव

मा.राज्यमंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक
प्रधान सचिव, नगरविकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक
प्रधान सचिव (ग्रामविकास), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक
सचिव, गृहनिर्माण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक
महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रादेशिक क्षेत्रविकास प्राधिकरण,बांद्रा कुर्ला संकुल,मुंबई
संचालक, नगरपालिका प्रशासन, वरळी, मुंबई.
उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी,महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण,वांद्रे (पू.) मुंबई.
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे
वित्त विभाग (व्यय-१४/अर्थोपाय,) मंत्रालय, मुंबई
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी
सर्व  विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी
सर्व समाजकल्याण अधिकारी,गट-अ, जि.प.
आयुक्त, सर्व महानगरपालिका
मुख्याधिकारी, सर्व नगरपालिका / नगरपरिषद
सर्व मंत्रालयीन विभाग.
महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर
निवड नस्ती-मावक-२.